**राज्यातील मच्छिमारांना मासेमारी परवाना व मासेमारी नोंदणी पध्दतीचे संगणकीकरण करण्याकरीता निधी वितरीत करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- मत्स्यवि-२०१०/प्र.क्र.३६/पदुम १४**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक ३१ मार्च, २०१०**

**वाचा :-१) केंद्र शासनाचे पत्र क्र.No.३००३५/०४/२००९-FY(T-१), दि.२७-११-२००९**
**२) शासन निर्णय क्र.पूरक-१०१०/प्र.क्र.३३/पदुम-१६, दि.३०-०३-२०१०**

**प्रस्तावना:-**

केंद्र शासनाने मत्स्यव्यवसाय क्षेत्राचा data base व भौगोलिक माहिती संकलनाचे बळकटीकरण या योजनेंतर्गत मासेमारी परवाना व मासेमारी नोंदणी वितरण पध्दतीचे संगणकीकरण करण्याचा निर्णय घेतलेला आहे. त्यानुसार राज्यातील सागरी जिल्ह्यात मच्छिमारांना देण्यात येणारे माच्छिमारी परवाने व नोंदणी पध्दत संगणकीकरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत मत्स्यव्यवसाय क्षेत्राचा data base व भौगोलीक माहिती संकलनाचे बळकटीकरण या योजनेंतर्गत मासेमारी परवाना व मासेमारी नोंदणी वितरण पध्दतीचे संगणकीकरण राज्यातील सागरी जिल्ह्यात (मुंबइ, रायगड, सिंधुदुर्ग, रत्नागिरी, ठाणे) मच्छिमारांना मासेमारी करण्यासाठी नौकाधारकांना देण्यात येणारे मासेमारी परवाने व नोंदणी पध्दत संगणकीकरण या आदेशाद्वारे शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे. यासाठी सन २००९-१० मध्ये अर्थसंकल्पीत निधी रु.३२,७८,९२५/- या आदेशाद्वारे वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. वरील प्रमाणे वितरीत करण्यात आलेला निधी हा खाली लेखाशिर्षातंर्गत उपलब्ध असलेल्या तरतूदच्या मर्यादेत खर्च करण्यात यावा

**मागणी क्र. डी-६**
**२४०५-मत्स्यव्यवसाय**
**(००)(१०३) सागरी मत्स्यव्यवसाय**
**०२-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना**
**(०२)(१३) मासेमारी परवाना नोंदणीकरण (२४०५ ४९०२)**
**३१ सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर)**

३. सदरहू योजनेअंतर्गत संगणकीकरण करण्यासाठी अवश्यक असलेली सामुग्री ही NICSI या केंद्र शासन अगीकृत संस्थेमार्फत तसेच अज्ञावली तयार करण्याची कार्यवाही NIC या संस्थेमार्फत करण्यात येणार आहे.

४. सदरहू योजनेसाठी सहाय्यक संचालक वित्त, आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांचे कार्यालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी यांनी मंजुर केलेली रक्क्म अधिदान कार्यालयातुन आहरित करुन मंजुर रक्कमे इतका निधीचा डिमांड ड्राफ M/s

**NICSI, New Delhi** या संस्थेच्या नावे तयार करुन तो National Informatic Centre, Services Inc. (Government of India Enterprises under NIC), Ministry of Communication and Information Technology, hall no.2 & 3, 6th Floor, NBCC Tower, 15 Bhikaji kama palace, New Delhi-66 या पत्यावर पाठविण्यात यावा.

५. आयुक्त मत्स्यव्यवसाय यांनी NIC या संस्थेशी संपर्कात राहुन सदरहू योजनेसंबंधी केलेल्या कार्यवाहीचा वेळोवेळी प्रगती अहवाल शासनास सादर करावा.

६. हे आदेश नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौंपचारिक संदर्भ क्रमांक १५४/१०/अर्थ-१५, दि.३१ मार्च, २०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावरुन प्रसारित करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००३३१२१४४१४००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**(प.श.अहमद)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

सचिव (पदुम), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
प्रादेशिक मत्स्यव्यवसाय उपसंचालक, कोकण विभाग, नविन प्रशासकीय इमारत, ३ रा मजला, चेतना कॉलेज जवळ, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१
उपसंचालक मत्स्यव्यवसाय (सागरी), आयुक्त, मत्स्यव्यवसाय, यांचे कार्यालय, मुंबई
सहाय्यक आयुक्त, मत्स्यव्यवसाय संचालक, मुंबई, ठाणे, रत्नागिरी, रायगड, सिंधुदुर्ग
कार्यकारी अभियंता (मत्स्यव्यवसाय), आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांचे कार्यालय, मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य १/२ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
जिल्हा कोषागार आाकारी, मुंबई, ठाणे, रत्नागिरी, रायगड, सिंधुदुर्ग
संचालक, लेखा व कोषागारे (संगणक शाखा), मुंबई
राष्ट्रीय सुचना केंद्र, महाराष्ट्र राज्य (NIC),११ वा मजला, नविन प्रशासकीय इमारत, मंत्रालय समोर, मुंबई-३२
वित्त विभाग, (व्यय-१/अर्थसंकल्प-१५/वित्तीय सुधारणा-१/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई-३२
कक्ष अधिकारी (पदुम-१२/पदुम-१३/पदुम-१६), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
निवडनस्ती.